**प्रादेशिक मनोरुग्णालय, पुणे, येथील डॉरमेट्रीक क्रमांक ४ (ऐश्वर्या वॉर्ड) ची दुरुस्ती, संरक्षक भिंत, अंतर्गत रस्ते, विज, पाणी इत्यादी मुलभुत सुविधा करण्यासाठी प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय, क्रमांकः प्रशामा २०१९/प्र.क्र.१९१/आरोग्य ३अ

१० वा मजला, संकुल इमारत,
जी.टी. रुग्णालय आवार, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : २१ नोव्हेंबर, २०१९.

**वाचा :-**

१) अतिरिक्त संचालक (आरोग्य संस्थामार्फत राबविण्यात येणारे कार्यक्रम), आरोग्य सेवा मुंबई यांचे पत्र क्रमांक- संआसे/माआ/टे-४/एश्वर्या वॉर्ड/दुरुस्ती/७४४/१९, दिनांक १३.०६.२०१९

२) अतिरिक्त संचालक (मानसिक आरोग्य), आरोग्य सेवा मुंबई यांचे पत्र क्रमांक- संआसे/माआ/टे-२/एश्वर्या वॉर्ड/प्रामरुपुणे/१३४१/१९, दिनांक ७.०८.२०१९

**प्रस्तावना:-**

प्रादेशिक मनोरुग्णालय, पुणे, येथील डॉरमेट्रीक क्रमांक ४ (ऐश्वर्या वॉर्ड) ची दुरुस्ती, संरक्षक भिंत, अंतर्गत रस्ते, विज, पाणी इत्यादी मुलभुत सुविधा करण्यासाठी प्रशासकीय मान्यता देणेबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत पुढील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय:-**

प्रादेशिक मनोरुग्णालय, पुणे, येथील डॉरमेट्रीक क्रमांक ४ (ऐश्वर्या वॉर्ड) ची दुरुस्ती, संरक्षक भिंत, अंतर्गत रस्ते, विज, पाणी इत्यादी मुलभुत सुविधा करण्याचा प्रस्ताव सहायक अभियंता (वर्ग-२), आरएमएच विभाग, येरवडा, पुणे यांनी तयार केले असून सहायक अभियंता (वर्ग-१), सार्वजनिक बांधकाम मेडिकल उपविभाग, पुणे, कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे व अधिक्षक प्रादेशिक मनोरुग्णालय, येरवडा, पुणे यांनी सांक्षाकित केलेला आहे. सदर कामाचे अंदाजपत्रक सन २०१८-१९ च्या दरसूची वर आधारीत आहे. प्रादेशिक मनोरुग्णालय, येरवडा, पुणे डॉरमेट्रीक क्र.४ (ऐश्वर्या वार्ड) च्या दुरुस्तीच्या कामासाठी रु. १८६.९८ लक्ष इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास पुढीलप्रमाणे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. :-

| NAME OF WORK :- Construction of approach road and renovation to Aishwarya ward at Regional Mental Hospital, Yerwada, Pune-6 | |
|---|---|
| **RECAPITULATION SHEET** | |
| Work Portion | RS. 15751374.00 |
| Royalty Charges | RS. 1515.00 |
| Testing | RS. 12200.00 |
| Total (A) | **RS. 15765089.00** |
| Add Electrical Charges (Internal) | 5% RS. 788254.00 |
| Add CGST+MGST on Work Cost | 12% RS. 1986401.00 |
| Insurance | 1% RS. 157636.00 |
| Total (B) | **RS. 2932291.00** |
| Total (A)+(B) | **RS. 18697380.00** |
| | **Say RS. 186.98 Lakh** |

२.अटी व शर्ती :-

१) काम सुरु करण्यापुर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा, तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूर घेऊन सुरु करावे.

२) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदी बाबत काम करते वेळी विस्तृतअंदाजपत्रक तयार करुनच काम हाती घ्यावे.

३) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्रमांक इएनव्ही-२०१३/प्र.क. १७७/तां.क्र.१, दि. १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

४) सदर कामाच्या बांधकामाचा खर्च उपलब्ध असलेल्या नियतव्ययामधून करण्यात यावा.

५) सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्र. बीडीजी २०१७/प्र.क. ६०/इमारती-२, दि.७/७/२०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

३. उपरोक्त बांधकामाकरीता होणारा खर्च " मागणी क्रमांक आर-१, २२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०१-नागरी आरोग्य सेवा व विषम चिकित्सा, ११०-रुग्णालय व दवाखाने, ११०-६-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना, (०६) (०९) - मध्यवर्ती मनोरुग्णालये, २७ -

लहान बांधकामे (२२१० ०२९१)" या लेखाशिर्षा अंतर्गत सन २०१९-२० मधील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम भाग-२, दि.१७.४.२०१५ सोबतच्या परिशिष्टामधील भाग पहिला, उपविभाग-पाच मधील अ.क्र. १, परिच्छेद क्रमांक - १३४ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१०१६१३२१२६१११७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pradip M Balkavde

Digitally signed by Pradip M Balkavde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8db6aab31faca2f1a89698a28c94703436c07cda664672d20607766dc59d345b, serialNumber=ed0fa40788bb5c0d7f76b869fa2e5835af215c6a80eae8f70eaf87b0cf68d63f, cn=Pradip M Balkavde
Date: 2019.11.21 17:16:27 +05'30'

**( प्र.मो.बलकवडे )**
अवरसचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महालेखापाल (लेखा परीक्षा /लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ / २, मुंबई/ नागपूर.
२. आयुक्त आरोग्य सेवा व अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
३. संचालक, आरोग्य सेवा-१, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
४. संचालक, आरोग्य सेवा-२, पुणे.
५. सह संचालक, आरोग्य सेवा, (खरेदी कक्ष), मुंबई.
६. वैद्दकीय अधिक्षक, प्रादेशिक मनोरुग्णालय, पुणे.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
८. अवर सचिव (अर्थसंकल्प), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. निवडनस्ती (कार्यासन आरोग्य-३अ).